१००टक्के केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गुरे पैदास (NPBB- National Programme for Bovine Breeding) या कार्यक्रमाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र: सीएसएस-२०१४ .क्र.प्र/१७२-पदुम /४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दि. २३ मार्च ,२०१५

<u>वाचा :</u> १. केंद्र शासनाच्या पदुम विभागाचे पत्र १-१/२०१२-DP, दि.१५/ ०५/२०१४
२. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्र.एमएलके- २०१४/प्र.क्र.३७/पदुम-८ मंत्रालय, मुंबई-३२ ,दि. ०४/८/२०१४

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने त्यांच्या वाचा १ येथील पत्रान्वये राष्ट्रीय गुरे पैदास व दुग्ध विकास कार्यक्रम - National Programme for Bovine Breeding and Dairy Development (NPBBDD) १२ व्या पंचवार्षिक योजने अंतर्गत सन २०१३ ते २०१७ पर्यंत राबविण्यास तसेच, यामधील उर्वरित राहिलेल्या बाबी १३ व्या पंचवार्षिक योजना कालावधीमध्ये राबविण्यास प्रशासकीय मंजुरी प्रदान केलेली आहे.

राष्ट्रीय दुग्ध विकास कार्यक्रम - National Programme for Dairy Development (NPDD) या योजनेच्या अंमलबजावणीस वाचा २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात आलेली असल्याने, राज्यात राष्ट्रीय गुरे पैदास कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यास याद्वारे, शासनाची प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

राष्ट्रीय गुरे पैदास (NPBB-National Project on Bovine Breeding) कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने खालील प्रमाणे उद्देश निश्चित केलेले आहेत.

१. शेतकऱ्यांच्या दारामध्ये गायी - म्हशींमध्ये कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करून देणे.
२. सर्व पैदासक्षम गायी / म्हैशींमध्ये उच्च प्रतिच्या गोठीत रेतमात्राव्दारे कृत्रिम रेतन करुन नैसर्गीक संयोगाकरिता उच्च प्रतिचे वळू उपलब्ध करून त्यांना पैदास कार्यक्रमांतर्गत समाविष्ट करणे.
३. देशी वंशावळीचे जतन, संवर्धन व संरक्षण कार्यक्रम राबविणे.
४. देशी वंशावळीच्या संरक्षणाकरिता संबंधित देशी जातीच्या पैदास क्षेत्रामध्ये कृत्रिम रेतनासाठी संबंधीत जातीच्या गोठीत रेतमात्रा अथवा नैसर्गीक संयोगाकरिता उच्च प्रतिचे वळू पैदासी साठी उपलब्ध करून, सदर देशी वंशावळीचा होणारा ऱ्हास व नाश थांबविणे. राष्ट्रीय गुरे पैदास कार्यक्रमाकरिता केंद्र शासनाकडून १०० टक्के अर्थ सहाय्य उपलब्ध होणार आहे.

सदर उद्दीष्ट पूर्तीच्या दृष्टीने केंद्र शासनाने -**राष्ट्रीय गोकूळ मिशन** व त्याअंतर्गत -**गोकूळ ग्राम योजना** राबविण्याचे निश्चित केले असून सदरचा उपक्रम मिशन मोड मध्ये राबविणे अभिप्रेत आहे. सदरच्या योजना राज्यामध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

या कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने राष्ट्रीय स्तरावर रु. ३०९.०० कोटी निधीची तरतुद केलेली असून, त्यापैकी रु.२०४.०० कोटी तरतुद राष्ट्रीय गुरे पैदास (NPBB) व उर्वरित रु. १०५.०० कोटी तरतुद राष्ट्रीय दुग्ध व्यवसाय विकास (NPDD) या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता उपलब्ध करून दिलेली आहे.

त्यानुसार, राष्ट्रीय गुरे पैदास व दुग्ध विकास -National Programme for Bovine Breeding and Dairy Development (NPBBDD) कार्यक्रमांतर्गत राज्यात राष्ट्रीय गुरे पैदास कार्यक्रमाची (NPBB) अंमलबजावणी करण्यासाठी **महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला** या संस्थेस **अंमलबजावणी यंत्रणा** )Implementing Agency ) म्हणून घोषित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी केंद्र शासनाने सदरहू योजनेच्या अंमलबजावणीसाठी त्यांच्या वाचा-१ येथील पत्रान्वये व वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेवुन ,सर्वसमावेशक प्रकल्प अहवाल तयार करावा व त्यास केंद्र शासनाची मंजुरी प्राप्त करून घ्यावी. सदरच्या प्रकल्प अहवालास केंद्र शासनाची मंजुरी प्राप्त झाल्यानंतर, या कार्यक्रमाची राज्यात अंमलबजावणी होण्याकरिता आवश्यक ती कार्यवाही करावी. या करिता, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी त्यांच्या संचालक मंडळाची वर्षातून दोनदा (मार्च व सप्टेंबर) बैठक आयोजित करावी व राष्ट्रीय गुरे पैदास कार्यक्रमाच्या भौतिक आणि आर्थिक उद्दीष्ट पूर्तीचा वेळोवेळी आढावा घेण्यात येवून ,प्रकल्प पूर्णत्वास जाण्याच्या दृष्टीने योग्य ते मार्गदर्शन करावे.

महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला या संस्थेच्या संचालक मंडळास या प्रकल्पाची **राज्यस्तरीय तांत्रिक व्यवस्थापन समिती** म्हणून काम करण्यास याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

तसेच, या प्रकल्पांतर्गत जिल्हास्तरीय अंमलबजावणी व संनियंत्रण समितीचे खालीलप्रमाणे गठन करण्यास देखील या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (संबंधित जिल्हा) | - अध्यक्ष |
| २. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी ,(संबंधित जिल्हा परिषद) | - सदस्य |
| ३. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (संबंधित जिल्हा) | - सदस्य |
| ४. जिल्हयातील गो-पैदासकार संघटनेचा प्रतिनिधी | - सदस्य |
| ५. महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| ६. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालयातील सहाय्यक आयुक्त | - सदस्य सचिव |

उपरोक्त जिल्हास्तरीय अंमलबजावणी व संनियंत्रण समिती, केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गुरे पैदास (NPBB) कार्यक्रमांतर्गत संबंधीत जिल्हयात / तालुक्यात राबविण्यात येत असलेल्या प्रकल्पांची सुयोग्य अंमलबजावणी तसेच ,संनियंत्रणाचे कार्य करेल. यास्तव, दर दोन महिन्यांनी बैठकीचे आयोजन करून प्रत्येक बैठकीअंती बैठकीचा सविस्तर अहवाल अंमलबजावणी यंत्रणेस सादर करेल.

मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांना सदरहू योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

सदरहू योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष स्वतंत्रपणे यथावकाश कळविण्यात येईल.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.६५२/नि.वि., दि .२.३.२०१५ व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र .१२४/१५/व्यय -२, दि .१७.३.२०१५ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१५०३२३१२१६०४९६०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

Machindra Apparao Pachpinde

Digitally signed by Machindra Apparao Pachpinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a6acbdcfb816875075a31b7754a1ac8c55c206e2845f9145cd34b586d977a703, cn=Machindra Apparao Pachpinde
Date: 2015.03.23 12:49:41 +05'30'

**(डॉ. एम. ए. पाचपिंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४) आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे-०७ (५ प्रतीत).
५) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-१८
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
७) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
८) जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (सर्व)
९) विभागीय व्यवस्थापक, गोठित रेत प्रयोगशाळा, पुणे / नागपूर / औरंगाबाद (हर्सुल)
१०) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
१२) अवर सचिव (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१/ १६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती